डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठास सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबींकरीता अनुदान वितरीत करणेबाबत..(कार्यक्रम)...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-११२५/प्र.क्र.९३/ई-१११३७८३/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११.०६.२०२५.

वाचा :- १. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५.
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-१५१९/प्र.क्र.६५/६-अे,दि.२६.०६.२०२३
३.नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्र.बासाकोकृवि/लेखा-२/१२०/२०२५, दि.०६.०५.२०२५.

**प्रस्तावना:-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ०१ च्या परिपत्रकान्वये सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमातंर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांनी उपरोक्त संदर्भ क्र.०३ च्या पत्रान्वये दापोली कृषि विद्यापीठास मागणी क्र. डी-३, २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण या मुख्य लेखाशिर्षाखालील ०१, पीकसंवर्धन (कार्यक्रम) २४१५ ००८१, ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००८१), या लेखाशिर्षांतर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान करीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००८१), या लेखाशिर्षांतर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान (कार्यक्रम) करीता रु.६००.०० लाख (अक्षरी रु.सहा कोटी फक्त) इतके अनुदान पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | लेखाशीर्षउपलेखाशिर्ष/ | कामांचा तपशिल | सन २०२५-२६ करीता अर्थसंकल्पित तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ०१ | ०१ पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०७), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००८१) | काढणी पश्चात व्यवस्थापन पदव्युत्तर संस्था, रोहा, जि.रायगड. | २०००.०० | १०.०० |
| ०२ | | मत्स्य अभियांत्रिकी विषयातील पदविका अभ्यासक्रम, शिरगांव, जि.रत्नागिरी. | | ५०.०० |
| ०३ | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत विविध महाविद्यालये, वसतीगृहे, तसेच इतर विविध शैक्षणिक १८ इमारतींसाठी अग्निश्यामक यंत्रणा उभारणे. | | १०.०० |
| ०४ | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत दिवेआगार ता.श्रीवर्धन, जि.रायगड येथे सुपारी संशोधन (विस्तारीत) केंद्र स्थापन करणे. | | १०.०० |
| ०५ | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत फॅकल्टी-२ ब्लॉक इमारतींची दुरुस्ती करणे. | | १००.०० |
| ०६ | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत फॅकल्टी-३ ब्लॉक इमारतींची दुरुस्ती करणे. | | १००.०० |
| ०७ | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत विविध संशोधन केंद्रे व इमारतीमध्ये अग्निशमक यंत्रणा व सी.सी.टि.व्ही. यंत्रणा उपलब्ध करुन देणेबाबत... | | ३२०.०० |
| **एकूण** | | | **२०००.००** | **६००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०७.०४.२०२५ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट /योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

५) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे, हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

७) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** यापित्यर्थ होणारा खर्च सन २०२५-२६ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**४.** सहायक लेखाधिकारी, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५.** सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०८/२०२५/ का-१४३१, दि.१५.०५.२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९२/२०२५/व्यय-१, दि.३०.०५.२०२५ देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०६१११८२४०५८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2025.06.11 18:25:07 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.

२) वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३) कुलगुरु/कुलसचिव, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
४) नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
५) सहायक लेखाधिकारी, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
६) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी व उपकोषागार अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०) उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२) उप सचिव,कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३) उप सचिव, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) कार्यासन ७-अ (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.